**फोर्ट, मुंबई येथील सीटीओ इमारतीतील जागा उच्च न्यायालयास भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## विधी व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२१५/१५३३/प्र.क्र.१६८/का.४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १८ जुलै, २०१७

**संदर्भ -**

१) प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. C.S./CTO 1ST flr/१२९८, दि. ०३/०५/२०१७, क्र. १५२४, दि. ५/०६/२०१७, क्र. १९२९, दि. ७/०७/२०१७ व क्र. १९५३, दि. १४/०७/२०१७.

२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, समक्रमांक दि. १३/१०/२०१६.

**प्रस्तावना -**

मा. उच्च न्यायालय, मुंबईच्या मा. न्यायमुर्तींच्या संख्येत झालेली वाढ तसेच उच्च न्यायालयाच्या कामकाजात झालेली प्रचंड वाढ विचारात घेऊन राज्य मंत्रीमंडळाच्या मान्यतेने केंद्रीय दूरसंचार मंत्रालयाच्या ताब्यातील फोर्ट, मुंबई येथील सीटीओ (CTO) इमारतीतील पहिल्या मजल्यावरील सुमारे १०००० चौ.फुट (कारपेट) इतकी जागा रु. ३६०/- प्रति चौ. फुट या दराने (वार्षिक ५% वाढीसह) मुंबई उच्च न्यायालयास भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यास तसेच त्यासाठी येणाऱ्या आवर्ती वअनावर्ती खर्चास संदर्भाधीन शासन निर्णय, दि. १३/१०/२०१६ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. मा. न्यायमुर्तींची संख्या वाढविण्यात आल्याने त्या प्रमाणात तातडीने जागा उपलब्ध करण्यासाठी सदर जागेचे अंदाजित आकारमान गृहीत धरून सदरहू मान्यता देण्यात आली होती. तथापि, यानुषंगाने भाडेकरार करण्यापूर्वी सदर जागेचे मोजमाप करण्यात आले असता सदर जागेचे आकारमान प्रत्यक्षात ११०९४.६४ चौ. फुट असल्याचे निदर्शनास आले असून कनिष्ठ दूरसंचार अधिकारी (Civil), विभागीय अभियंता, उच्च न्यायालय (सार्वजनिक बांधकाम विभाग) मुंबई, उप अभियंता, पश्चिम (सार्वजनिक बांधकाम) उप विभाग, मलबार हिल, मुंबई यांनी ते प्रमाणित केले आहे. त्याप्रमाणे ११०९४.६४ चौ. फुट इतक्या जागेकरिता प्रति चौ. फुट रु. ३७८/- याप्रमाणे खर्च परिगणित करुन उच्च न्यायालयाने सादर केलेला सुधारित प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन शासन निर्णय, दि. १३/१०/२०१६ अधिक्रमित करण्यात येत असून फोर्ट, मुंबई येथील सीटीओ इमारतीतील पहिल्या मजल्यावरील ११०९४.६४ चौ. फुट इतकी जागा रु. ३७८/- प्रति चौ. फुट या दराने मुंबई उच्च न्यायालयास भाडेतत्वावर उपलब्ध करुन देण्यासाठी आवश्यक असणाऱ्या खालील खर्चास यासंदर्भातील भाडेकरारनामा अंमलात येईल त्या दिनांकापासून प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

अ) **आवर्ती खर्च** :-

I) ११०९४.६४ चौ.फुट (कारपेट) इतकी जागा रु. ३७८/- प्रति चौ.फुट या दराने भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास येणारा दरमहा आवर्ती खर्च रु. ४१,९३,७७४/- (वार्षिक रु. ५,०३,२५,२८८/-)

II) रु. २.५० प्रति चौ.फुट या दराने सुमारे १४७९२.४८ चौ.फुट इतक्या सुपर बिल्टअप एरियावर ऑपरेशनल व मेंटेनन्स कॉस्ट यासाठी दरमहा रु. ३६,९८१/- (वार्षिक रु. ४,४३,७७२/-)

III) उपरोक्त अ.क्र. I व II यावर प्रचलित दराने (१८ %) वस्तु व सेवा कर अदा करण्यासाठी दरमहा रु. ७,६१,५३६/- (वार्षिक रु. ९१,३८,४३२/-)

एकूण वार्षिक आवर्ती खर्च (I+II+III) = **५,९९,०७,४९२/-**

ब) उपरोल्लेखित प्रति चौ. फुट भाडेदरात प्रस्तावित ५ % वार्षिक वाढ.

क) **अनावर्ती खर्च** :-

I) प्रस्तावांतर्गत जागेसाठी अनामत रक्कम :

दरमहा एकूण भाडेखर्चाच्या तिप्पट : रु. ४९,९२,२९१ X ३ = **रु. १,४९,७६,८७३/-**

II) भाडेकरारनामा करण्यासाठी रजिस्ट्रेशन फी, स्टॅम्प डयुटी इत्यादीवरील अनुज्ञेय खर्च.

२. सदर मान्यता कनिष्ठ दूरसंचार अधिकारी (Civil), विभागीय अभियंता, उच्च न्यायालय (सार्वजनिक बांधकाम विभाग) मुंबई, उप अभियंता, पश्चिम (सार्वजनिक बांधकाम) उप विभाग, मलबार हिल मुंबई यांनी उपरोक्त जागेचे मोजमाप करून प्रमाणित केल्यानुसार देण्यात येत आहे.

३. तसेच यानुषंगाने करावयाच्या भाडेकरारासाठी उपरोक्त जागेचे एक महिन्याचे मासिक भाडे आगाऊ स्वरुपात देण्यास सदर शासन निर्णयान्वये एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोल्लेखित प्रति चौ. फुट भाडेदरात प्रतिवर्षी ५% इतकी वाढ होईल, असे बीएसएनएल लिमिटेडने प्रस्तावित केले आहे. या प्रस्तावित भाडेवाढीस व त्यापोटी येणाऱ्या खर्चास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे. यासाठी प्रतिवर्षी मंजूरी देण्यासाठी स्वतंत्र आदेश शासनामार्फत निर्गमित केले जाणार नाहीत.

५. याप्रित्यर्थचा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (भारित), १०२ उच्च न्यायालये (०२)(०१) प्रबंधक, मूळ शाखा, (२०१४ ००७४) १४ भाडे, पट्टी व कर " या लेखाशिर्षाखालील त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. प्रस्तुत आदेश हे वित्तिय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अनुक्रमांक १०, नियम ११५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये तथा वित्त विभागाचे अनौ. संदर्भ क्र. ७३८/१७/व्यय ५, दि. १२/०७/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तथा शासनाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१८१७३३१३१११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev Rajaram Keluskar

Digitally signed by Sanjeev Rajaram Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Low And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev Rajaram Keluskar
Date: 2017.07.21 12:13:31 +05'30'

**(संजीव केळुसकर)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
२. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
३. महाव्यवस्थापक (एल ॲण्ड बी), बीएसएनएल लिमिटेड, सांताक्रुझ (प), मुंबई - ४०० ०५४
४. प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र-एक, मुंबई
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. कार्यासन २३, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.